केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत सुविधा अभियानातील आदिवासी उपयोजनेकरिता सन २०२३-२४ च्या सुधारित अर्थसंकल्पिय तरतुदीतून २२१०H४८१ या लेखाशिर्षातून केंद्र हिश्श्यापोटी रू.२९७.०० लक्ष व २२१०H४९२ या लेखाशिर्षातून राज्य हिश्श्यापोटी रु.१९८.०० लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२४/प्र.क्र.१२८/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १९ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) भारत सरकार, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण, नवी दिल्ली यांचे अर्धशासकीय पत्र क्र.D.O.No.७/४८/२०२०-NHM-१, दिनांक ०१.११.२०२१.

२) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. G.२७०१८/२०२३-२४/NHM-Finance/FTS-८२२१८०२,दि.२९.०२.२०२४

३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दि.०५.१२.२०२३

४) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४/अर्थ-३ दि.०८.१२.२०२३

५) आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक बीयुडी-२०२४/प्र.क्र.५०/कार्यासन-६, दिनांक १३.०३.२०२४

६) संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/कें.रा.हि./१४१७६९-७६/२०२३-२४, दिनांक ०१.०३.२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिनांक ०१.११.२०२१ च्या अर्धशासकीय पत्रान्वये "प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत सुविधा अभियान (PM Ayushman Bharat Health Infrastructure Mission)" ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. प्राथमिक आरोग्य सेवेचे महत्व, आरोग्य शिक्षण आणि प्रतिबंध यासह सर्वसमावेशक प्राथमिक आरोग्य सेवा देण्यासाठी सार्वजनिक आरोग्य संस्थांना बळकट करणे, सार्वजनिक आरोग्य प्रशासन संस्था बळकट करणे, तसेच गंभीर काळजी सेवांसह सर्वसमावेशक निदान आणि उपचाराच्या क्षमतेसह सद्याच्या आणि भविष्यातील साथीच्या रोग/ महामारीमुळे उद्भवलेल्या आवाहनांना तोंड देण्यासाठी उपरोक्त

कार्यक्रम राबविण्याची आवश्यकता आहे. त्यासाठी ग्रामीण व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी आरोग्य सेवा प्रदान सुनिश्चित करण्यासाठी केंद्र शासनाने सन २०२१-२२ ते सन २०२५-२६ या कालावधीकरीता या अभियानास मंजुरी दिली आहे. प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत सुविधा अभियानअंतर्गत आदिवासी घटकाकरिता केंद्र शासनाकडून ६० टक्के २२१०H४८१ या लेखाशिर्षाखाली रु.२९७.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी ४० टक्के लेखाशिर्ष २२१०H४९२ खाली रु.१९८.०० लक्ष इतकी रक्कम राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत सुविधा अभियानतंर्गत आदिवासी घटकाकरिता करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून सन २०२३-२४ मधील ६०% केंद्र हिश्श्यातील व ४०% राज्या हिश्श्यातील रक्कम वितरीत करण्यास आदिवासी विकास विभागास विनंती करण्यात आली होती. तथापि, संदर्भ (क्र.३) व (क्र.४) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी करण्यात आलेली मुळ अर्थसंकल्पीय तरतुद व पुरवणी मागणीद्वारे करण्यात आलेली अर्थसंकल्पीय तरतुद केंद्र हिस्सा व समरुप राज्य हिस्सा सर्व मंत्रालयीन विभागानां बीम्स प्रणालीवर १०० टक्के वितरित केलेला असल्याने सदर परिपत्रकांती सुचनांचे पालन करुन निधी आहरित करण्याची कार्यवाही करण्याबाबत वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. तसेच संदर्भ (क्र.५) येथील आदिवासी विकास विभागाच्या दिनांक १३.०३.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील मान्यतेच्या अनुषंगाने केंद्र हिश्श्याचे २२१०H४८१ या लेखाशिर्षाखाली रु.२९७.०० लक्ष व राज्य हिश्श्याचे २२१०H४९२ या लेखाशिर्षाखाली रु.१९८.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

**(रु. लाखात)**

| **अ. क्र** | **तपशिल** | **केंद्र व राज्य हिस्सा** | | |
|---|---|---|---|---|
| | | **लेखाशिर्ष** | **सन २०२३ २४-सुधारित अंदाज** | **मागणी रक्कम केंद्र व राज्य) हिस्सा )** |
| | मागणी क्रं.टी-५,<br>२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य<br>७९६ जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाति क्षेत्र उपयोजना | २२१०H४८१ | १२६९.८० | २९७.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | (०१)(४२) प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत अभियान (कार्यक्रम)<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | | | |
| | मागणी क्रं.टी-५,<br>२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य<br>७९६ जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१)(४३) प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत अभियान (कार्यक्रम)<br>(राज्य हिस्सा ४० टक्के)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर | २२१०H४९२ | ५००.०० | १९८.०० |

c

२. सदरचा खर्च वर तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखालील सन २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय , मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

६. सदरचे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/ प्र.क्र.८५/ २०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

७. प्रस्तुत शासननिर्णय, वित्त विभाग परिपत्रक दिनांक ०५.१२.२०२३ व ०८.१२.२०२३ आदिवासी विकास विभाग शासन परिपत्रक दिनांक १३.०३.२०२४ मधील तरतूदींच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२४०३१६११२७४०२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2024.03.19 16:05:42 +05'30'

**( राजेंद्र वि.कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
११.निवडनस्ती (आरोग्य-७) .